**उच्च व्यावसायिक व इयत्ता बारावीनंतर सर्व अभ्यासक्रमांमध्ये शिक्षण घेणाऱ्या राज्यातील अल्पसंख्याक विद्यार्थ्यानकरीता असलेली शिष्यवृत्ती योजना (वैद्यकीय अभ्यासक्रम वगळून ) अंतर्गत १ टक्का प्रशासकीय खर्चासाठी निधी वितरित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : अविवि-२०२२/ प्र.क्र.४८/का-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २० मार्च, २०२४.

**वाचा -**

१) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांक अविवि २०११/प्र.क्र.४४/११/का-६, दिनांक १४ ऑक्टोबर, २०११.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक : अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३,दि.०४/०४/२०२२.
३) शासन निर्णय क्रमांक२०२२ ,ऑक्टोबर ४दिनांक ,६.का /५०.क्र.प्र/२०२०-अविवि-
४) संचालक, शिक्षण संचालनालय (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, मध्यवर्ती इमारत, पुणे-०१ यांचे क्र. उशिसं / शिष्य-२०२२ / राज्य अल्प. भाग २ / महाआयटी / १३७११, दिनांक १७ नोव्हेंबर,२०२२ चे पत्र.
५) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे क्र. १८/ तांशिस / नि.मा. / SGS / शा.पत्र. /२०२२ /०२, दिनांक ४.१.२०२३ चे पत्र.
६) संचालक, संचालनालय, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई- यांचे क्र. निरंक, दि.४.१.२०२३ चे पत्र.
७) शासन निर्णय क्रमांक : अविवि-२०२२/ प्र.क्र.४८/का-६, दि. २० नोव्हेंबर,२०२३

**प्रस्तावना :-**

राज्यातील अल्पसंख्याक समाजातील उच्च व्यावसायिक शिक्षण घेणाऱ्या व इयत्ता बारावीनंतर सर्व अभ्यासक्रमांमध्ये शिक्षण घेत असलेल्या आर्थिकदृष्ट्या कमकुवत व गुणवत्ताधारक विद्यार्थ्यांकरीता शिष्यवृत्ती योजनेची अंमलबजावणी वरील संदर्भ क्र.१ येथे उल्लेखित दिनांक १४ ऑक्टोबर २०११ च्या शासन निर्णयानुसार करण्यात येत आहे.

**२.** उपरोक्त योजनेकरिता सन २०२३-२४ या आर्थिक वर्षामध्ये "मागणी क्र.झेडई-१, मुख्य लेखाशिर्ष २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२-समाजकल्याण, २००-इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना-(०१) (२०) उच्च शिक्षण घेणाऱ्या अल्पसंख्याक विद्यार्थ्यांकरिता शिष्यवृत्ती योजनेकरिता सहायक अनुदान (कार्यक्रम) (२२३५ ए ३३८) ३१ "सहायक अनुदाने (वेतनेतर" या लेखाशीर्षाखाली एकूण **रुपये १.००/- कोटी** इतकी अर्थसंकल्पीय तरतूद मंजूर करण्यांत आलेली आहे. सद्यस्थितीत बीडीएसवर **रू. १८.००/- लाख** इतका निधी वितरणासाठी उपलब्ध असून, सदर उपलब्ध निधीमधून संचालक, शिक्षण संचालनालय (उच्च शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे यांना रू.७९,५१७/- व संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई-

४००००१. यांना रू. १७,२०,४८३/- असा एकूण रू. १८,००,०००/-इतक्या निधी वितरणाचा शासन निर्णय निर्गमित करण्यात येईल.

३. संचालक, शिक्षण संचालनालय (उच्च शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी त्यांच्या दिनांक १७.११.२०२२ रोजीच्या पत्रान्वये माहे सप्टेंबर, २०१९ ते माहे सप्टेंबर, २०२२ या कालावधीतील सेवांकरीता रू.२,७९,५१६.८२/- इतक्या रकमेची व संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई-४०० ००१. यांनी त्यांच्या दिनांक ४.१.२०२३ रोजीच्या पत्रान्वये रू. ६०,००,०००/- इतक्या प्रशासकीय खर्चाची मागणी केली होती.

४. संचालक, शिक्षण संचालनालय (उच्च शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या संदर्भाधीन अनुक्रमांक **४** येथील दिनांक १७ नोव्हेंबर,२०२२ च्या पत्रान्वये माहे सप्टेंबर, २०१९ ते माहे सप्टेंबर, २०२२ या कालावधीतील सेवांकरीता रू. २,००,०००/- व संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई-४००००१. यांच्या संदर्भाधीन अनुक्रमांक ५ येथील दिनांक ४.१.२०२३ च्या पत्रान्वये रू. ४०,००,०००/- असा एकूण रू. ४२,००,०००/- इतका निधी संदर्भाधीन अनुक्रमांक ७ येथील दिनांक २० नोव्हेंबर २०२३ वितरीत करण्यात आला आहे. उर्वरीत निधी रक्कम **रु. १८.००** लाख उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## शासन निर्णय :-

संचालक, शिक्षण संचालनालय (उच्च शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या संदर्भाधीन अनुक्रमांक **४** येथील दिनांक १७ नोव्हेंबर,२०२२ च्या पत्रान्वये माहे सप्टेंबर, २०१९ ते माहे सप्टेंबर, २०२२ या कालावधीतील सेवांकरीता **रू. ७९,५१७/-** व संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई-४००००१. यांच्या संदर्भाधीन अनुक्रमांक **५** येथील दिनांक ४.१.२०२३ च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरुन, माहे ऑगस्ट, २०१९ ते माहे डिसेंबर, २०२२ या कालावधीतील व त्यानंतरच्या कालावधीतील सेवा देयके तसेच दिनांक ४ ऑक्टोबर, २०२२ रोजीच्या शासन आदेशामध्ये योजना राबविण्यासाठी योजनेची प्रसिध्दी, प्रवासखर्च, आवश्यक असणारी यंत्रसामग्री (संगणक / प्रिंटर, फर्निचर इत्यादी ) तसेच डीबीटी पोर्टलद्वारे योजना राबविण्यासाठी सेवा देयकाची रक्कम, खाजगी परिरक्षण, इंटरनेट खर्च, टेलाफोन खर्च, स्टेशनरी, न्यायालयीन प्रकरणे, लेखापरीक्षण यासारख्या विविध बाबींकरिता येणारा खर्च भागविण्याकरीता **रू. १७,२०,४८३/- असा एकूण रू.१८,००,०००/- (अक्षरी रुपये अठरा लाख फक्त)** इतका निधी याद्वारे वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर रक्कम संचालक, शिक्षण संचालनालय (उच्च शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे व संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र, राज्य, मुंबई यांच्या स्वाधीन करण्यात येत असून, संचालक, शिक्षण संचालनालय (उच्च शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे व संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र, राज्य, मुंबई या कार्यालयातील आहरण व संवितरण अधिकारी हे प्रस्तूत योजनेकरिता देखील आहरण व संवितरण अधिकारी म्हणून तसेच सदर कार्यालयातील संचालक हे नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. सदर निधीचे वाटप त्वरीत करावयाचे असल्यामुळे या निधीचे मासिक खर्च विवरणपत्र देण्याचा प्रश्न उद्भवत नाही.

३. याद्वारे वितरीत करण्यात आलेला निधी हे अनुदान खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियमपुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच वेळोवेळी शासनाने या अनुषंगाने दिलेले सर्व निर्देश / नियम / शासन निर्णय / आदेश आणि केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचना आणि नियंत्रक व महालेखापरिक्षक यांच्या निरीक्षणाचे पालन करण्यात यावे.

४. सदर शासन निर्णय उपरोल्लेखित **संदर्भ क्र.२** येथील शासन परिपत्रकातील तरतुदींस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

**५.** सदर प्रयोजनासाठी होणारा खर्च मागणी क्र.झेड ई-१, मुख्य लेखाशिर्ष २२३५,सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (२०) उच्च शिक्षण घेणाऱ्या अल्पसंख्याक विद्यार्थ्यांकरिता शिष्यवृत्ती योजनेकरिता सहाय्यक अनुदान (कार्यक्रम) (२२३५-ए-३३८) या लेखाशिर्षाखाली "३१-सहायक अनुदान (वेतनेतर)" सन २०२३-२४ या वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या अर्थसंकल्पीत अनुदानातून भागविण्यात यावा.

**६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३२०१६३५५८५३१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने .

MOHINUDDIN
B TASHILDAR

Digitally signed by MOHINUDDIN B TASHILDAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITIES DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=7eac303551c8c1c40121e24c1d7fb18a03efe22c688ba9240e47d3c712ae3ea9, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=7E694259001AF4DCAD48B69EB7E39AFC9472E61C49FC40EB7D603AE236006903, cn=MOHINUDDIN B TASHILDAR
Date: 2024.03.20 16:45:06 +05'30'

**( मो. बा. ताशिलदार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३. मा. मंत्री / मा. राज्यमंत्री अल्पसंख्याक विकास यांचे खाजगी सचिव
४. सर्व मा. मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
५. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
६. मा. विधानसभा/विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
७. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
८. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. अपर मुख्य सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. प्रधान सचिव, वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई.
११. सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. महालेखापाल १ / २ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
१३. महालेखापाल १ / २ (लेखापरीक्षा), मुंबई / नागपूर.
१४. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई.
१५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१६. संचालक, (उच्च शिक्षण), उच्च शिक्षण संचालनालय, पुणे
१७. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, मुंबई
१८. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन संचालनालय, मुंबई
१९. सह सचिव / उप सचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०. अवर सचिव (अर्थसंकल्प शाखा), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१. निवड नस्ती.